सन २०२२-२३ करीता लेखाशिर्ष २४०२ ००३२ (००) (०२) मृद सर्वेक्षण आणि अन्वेषण व मृदविश्लेषण रसायन प्रयोगशाळा (अनिवार्य) या लेखाशिर्षातंर्गत बाबींकरीता पुनर्वितरणाद्वारे निधी मंजूर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्सव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण १६२३/प्र.क्र. ६३/१७-अे**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,**
**मंत्रालय, मुंबई ४०००३२.**
**दिनांक: ३१/०३/२०२३.**

वाचा :- कृषि आयुक्तालय, पुणे यांचे जा.क्र.कृआ/मृसमृचा/लेखा/००३२/९३६३/२०२३, दि. १३/०३/२०२३.

**प्रस्तावना :-**

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये लेखाशिर्ष २४०२ ००३२ (००)(०२) मृद सर्वेक्षण आणि अन्वेषण व मृद विश्लेषण रसायन प्रयोगशाळा (अनिवार्य) अंतर्गत ११- देशातंर्गत प्रवास खर्च या घटकाकरीता रु. १५.०० लाख इतकी रक्कम अर्थसंकल्पीय करण्यात आलेली आहे. राज्यामध्ये एकूण ३२ मृद सर्वेक्षण आणि अन्वेषण व मृदविश्लेषण रसायन प्रयोगशाळा कार्यरत आहेत. सद्य:स्थितीत सदर लेखाशिर्षाखाली ११- प्रवास भत्ता या घटकासाठी रु. १०,५०,०००/- लाख इतका निधी वितरीत करण्यात आलेला आहे. सदर वितरीत निधीपैकी रु. ३,८४,७१४/- इतका निधी खर्च झाला आहे. उर्वरित रु. ३,८६,३९१/- इतका निधी प्रयोगशाळांनी समर्पित केलेला आहे. सदर निधी १३-कार्यालयीन खर्च या घटकासाठी उपलब्ध करुन देण्याची मागणी राज्यातील मृद सर्वेक्षण व चाचणी प्रयोगशाळांकडून करण्यात येत असल्याची बाब वरील संदर्भीय पत्रान्वये निदर्शनास आणली आहे. त्यानुषंगाने, लेखाशिर्ष २४०२ ००३२ मध्ये ११- प्रवास भत्ता या घटकामध्ये रु. ३,८६,३९१/- इतका समर्पित करण्यात आलेला निधी १३- कार्यालयीन खर्च या घटकासाठी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आर्थिक वर्ष २०२२-२३ मध्ये लेखाशिर्ष २४०२ ००३२ (००)(०२) मृद सर्वेक्षण आणि अन्वेषण व मृद विश्लेषण रसायन प्रयोगशाळा (अनिवार्य) या लेखाशिर्षा खालील ११- प्रवास भत्ता या

घटकामध्ये समर्पित करण्यात आलेला निधी १३- कार्यालयीन खर्च या घटकासाठी वित्त विभागाच्या मान्यतेने पुढीलप्रमाणे पुनर्वितरणाद्वारे उपलब्ध करुन देण्यात येत आहे :-

(रु. लाख)

| अ.क्र. | तपशीलवार शिर्ष | मुळ अर्थसंकल्पीत तरतूद | सुधारीत अर्थ संकल्पीत तरतूद | वितरीत निधीपैकी खर्च | वितरीत निधीपैकी आवश्यक असलेला निधी | समर्पित निधी | पुनर्वितरणा द्वारे उपलब्ध करुन देण्यात येणारा निधी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १. | ११- देशातंर्गत प्रवास खर्च | १५.०० | १०.५० | ३.८४७१४ | २.७८८९५ | ३.८६३९१ | (-) ३.८६३९१ |
| २. | १३- कार्यालयीन खर्च | २८.३३ | २५.५० | १७.१६२४२ | - | - | (+) ३.८६३९१ |

२. राज्यातील मृद सर्वेक्षण आणि अन्वेषण व मृद विश्लेषण रसायन प्रयोगशाळांना लेखाशिर्ष २४०२००३२ अंतर्गत वरील विवरणपत्रामध्ये दर्शविल्यानुसार ११- प्रवास भत्ता या घटकामधून समर्पित करण्यात आलेला रु. ३.८६३९१ इतका निधी १३-कार्यालयीन खर्च या घटकाकरीता उपलब्ध करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर बाबीकरीता होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा :-

मागणी क्रमांक
डी-३, मृद व जलसंधारण
१०१ मृद सर्वेक्षण मृद चाचणी
(००) (०२) मृद सर्वेक्षण आणि अन्विषा व मृद विश्लेषण प्रयोगशाळा
२४०२ ००३२ (योजनेत्तर योजना)

४. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे/ टेंडर नियमावली व नियमांचे / प्रक्रियेचे/ वित्तीय अधिकाऱ्यांच्या मर्यादेत/ P.W.D./ मॅन्युअलचे अधीन राहून/ C.V.C. तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार/ प्रचलित शासन निर्णय/ नियम/ परिपत्रक/ तरतुदीनूसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही

अंमलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्यात यावी. तसेच वितरीत केलेल्या निधीचे "उपयोगिता प्रमाणपत्र" शासनास सादर करावे.

५. सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ८८/२०२३/व्यय-१ दिनांक २९/०३/२०२३ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३१११२९३०५००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by PIMPALE PRASHANT RAMESH
Date: 2023.03.31 11:34:51 +05'30'

**( प्रशांत र. पिंपळे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२) प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
४) सहसचिव ( निविष्ठा व गुणनियंत्रण) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) उप सचिव (अर्थसंकल्प), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सर्व कृषि संचालक / कृषि सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७) कृषि संचालक ( निविष्ठा व गुणनियंत्रण ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८) सर्व विभागीय कृषि सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) उपसंचालक (प्रयोगशाळा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
११) वित्त विभाग- (व्यय-१/अर्थसंकल्प -१३), मंत्रालय, मुंबई
१२) कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) **१७**-अे कार्यासन, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई (निवड नस्ती)